आणि बसतात. धर्माचें रक्षण करीत नाहीत; गरीबांची हजवीज करीत नाहीत, लोकांस धर्माची व धर्मतत्पर करावें तें नाही. फक्त आपलें पोट आणि यजमानाची स्तुति, अशीं मात्र ते आळशी लोक कामें करतात. व त्यांस जो पैका देतात, तो कांही उपयोगाकरिता हेत नाहीत. असा धर्म करणें हें फक्त आळशीपणाची वृद्धि करणें आहे. या प्रमाणें अनुष्ठानें, जप-वगैरे जितक्या ब्राह्मणांच्या मिळकती आहेत, त्या सर्व अन्याय आहेत. व प्राचीन काळापासून चालत आलेल्या दक्षिणा, खिचडी, सभा, देवस्थानें या प्रकारचीं आहेत. यांची सुधारणा लोकांशिवाय होणार नाही. लोक सुधारले म्हणजे अर्थातच सर्व त्यांचे पुढारी सुधारतील, किंवा जेव्हा त्यांचे पुढारी सुधारतील, तेव्हा लोक सुधारतील. परंतु सांप्रतचे धर्मांत सर्वांचें कल्याण होणें, हें कधींही होत नाही.

---

पत्र नं १५

## अभिमान

मागले पत्रांत सरकारास मदत मिळत नाही, म्हणून लोकांच्या बेबंदपणाचा स्वभाव वर्णन केला, परन्तु आणखीही लिहितों की, आमचे लोक सरकारास मदत कोठून देणार? आमच्यापैकी एक शहाणा होऊन पुढारी झाला, तर त्याचे जें कांही सांगितलें, तें देखील ऐकावयाचे नाहीत. व त्यास शहाणा असें मानणार नाहीत. दुसऱ्यास शहाणा म्हणणें हें मोठें अपमानाचें कारण आहे, असें सर्व लोक समजतात. ब्राह्मण तर मुख्यत्वेंकरून असें समजतातच.

जर एक पंडित दुसऱ्यापेक्षा शहाणा असेल, तर त्याशीं शत्रुत्व करून व त्याजवर कुतर्क करून, त्यास सभेंत निरुत्तर करावें म्हणजे

मिळाली तर ती देवळांत किंवा धर्मशाळेंत. व त्यास कोणी सामान देणारा नाही. हात धुवावयास नदीवर गेलें पाहिजे. लाकडें शोधून आणलीं पाहिजेत, याजकरितां जरूर आहे की, एका माणसानें अशा धर्मशाळेचे मुख्तयार होऊन त्याणें पैसा घेऊन सर्व पुरवावें. व जातीप्रमाणें प्रत्येकाचा धर्म राखावा, इतकी तजवीज झाली तर बरें पडेल.

मुंबईचे वाटेनें असे ब्राम्हण लोक आहेत. परंतु जेथें ब्राम्हण लोक आहेत, तेथें कुळंबी जावयाचा नाही. जेथें कुळंबी जातो, तेथें महार जाणार नाही. या अडचणी अतिशय आहेत. या युक्तीनेच दूर केल्या तर होतील. नंतर ब्राम्हण लोक प्रवास करूं लागतील. सांप्रत ब्राम्हणांस जर चौपट नफा जहाला, तर घराबाहेर जाणार नाहीत. ते म्हणतात पुण्यांत दहा रुपये नफा बरा; पण मुंबईत पन्नास रुपये नको. ते म्हणतात की, त्या विटाळांत कोण जातो ? येथून आपलें तारतम्य, आपला ब्राम्हणी विचार व आचार कसा चालेल ? कोठें प्रवासास जावें ? इत्यादि विचार करून ब्राम्हण लोक बहुतकरून घराबाहेर पडत नाहीत. जर कदाचित् उपाय नाहीसा झाला, तर मात्र पडतील. तरी त्यांस फार अमंगळ वाटेल. त्यांस वाटेल की, आज पंधरा दिवस मुंबईत मी राहिलों खरा, परंतु जरी दोन पैसे नफा झाला, तरी धर्म बुडाला, पाणी विटाळाचें पियालों, शिवाशिव जहाली; निर्मळपणा कांही राहिला नाही. सोनार, परभू यांचा संपर्क जहाला; आणि या प्रमाणें हजारो ब्राम्हण म्हणतात. ब्राम्हणांची रीत अशी आहे की, घरांत सोंवळें-ओंवळें माजवावें व पुढें पाणी शिंपून मागें चालावें. ग्रहण पडलें म्हणजे सर्व घरांतील टाकून द्यावें. आंघोळी कराव्या. कुळंब्याचा शब्द कानीं पडूं देऊं नये. हें त्यांस गोड वाटतें, म्हणून बाहेर पडावयाचा कंटाळा आणि त्रास करतात.

दुसरे आणखी बहुत प्रकार गैरशिस्त या देशांत आहेत, त्यांपैकी कांही खालीं लिहितों. भिकारी लोक जे आहेत, त्यांचा कर सर्वांवर आहे. धर्माप्रमाणें त्यांस देणें योग्य आहे. परंतु पहा की, भिकारी लोकांच्या

## गरिबांच्या धर्माची व्यवस्था

अवस्था आमचे लोकांमध्ये किती आहेत? भिकारी लोकांमध्ये दोन पक्ष समजले पाहिजेत. एक पक्ष धर्माध्यक्ष भिकारी आणि दुसरा पक्ष अशक्त भिकारी. आता पहिले पक्षांत शास्त्री, पंडित, हरिदास, पुराणिक, वैदिक, जोशी, भट, तपस्वी हे सर्व जाणावे. दुसरे पक्षांत हर एक जातीचे आंधळे, पांगळे, लंगडे, व्याधिष्ट, दरिद्री, वयाने लहान, अज्ञान इत्यादि सर्व जाणावे. आता पहा की, दुसरे पक्षाचे भिकारी लोकां-करिता कोणी कांहीच धर्म करीत नाही. हिंदु लोक अज्ञान दूर करण्या-करिता आणि रोग जाण्याकरिता आणि विद्या होण्याकरिता कांही धर्म करतील, हें तर होणार नाही. कोणी मेला व त्याचे पोरांचें रक्षण करण्या-करिता कोणी नाही, तर त्याजकरिता कोणी धर्म करणार नाही.

जात पाहून धर्म करतात. तैलंग ब्राम्हण भिक्षेकरी असला तर त्यास तांदूळ घालतात, तोच गुजराथी असला तर जोंधळे घालतात; पहिरागी असला तर कदाचित् पीठ घालतात. माधुकरी मागणारा जर ब्राम्हण असला, तर अन्न येऊं देतील, नाही तर माधुकरी कदापि घालणार नाहीत. जेवतांना दुसरे जातीचा शब्द कानावर पडला असतां विटाळ जहाला, म्हणतील. जर एकपिती होऊन वृद्धापकाळाने व रोगाने उद्या मरणार, असा मनुष्य परजातीचा रस्त्यावर पडला असेल व त्यास अद्य चार दिवस खावयास मिळालें नसेल, तर त्याजकडेस कोणी पहाणार नाहीत. शेकडो ब्राम्हण लोक घोड्यावर जातील, परन्तु त्या गरिबाकडे डोळाद्देखील करावयाचे नाहीत. आणि तो जर महाराचे जातीचा असला तर त्यास शिवणार नाहीत व पाणी देणार नाहीत. तो तेथे अन्नावाचून मरेल. असे किती एक नित्य मरत आहेत. त्यांत गांव खेडें असलें तर कांही तरी संभाळ होईल. परंतु शहरांत लोक अगदीच पुसणार नाहीत. जर गाय बैल मरत असेल तर त्यास कोणी तरी ब्राम्हण जपतील, परंतु अन्य जातीच्यास अगदीच पहाणार नाहीत. याप्रमाणे गरिबांचा धर्माची व्यवस्था आहे.

शिवाय आणखी चाल अशी आहे की, पुण्यासारख्या शहरांत

त्याला अपमान करण्यांत आपला मान द्विगुणित झाला असें समजतात. तुमच्यास प्राण गेला तरी ब्राह्मण म्हणत नाहीत. सांप्रत कोणत्याही ब्राह्मणास पुसा की, इंग्रज ब्राह्मण आहेत की काय ? तर ते म्हणतील 'छिः छिः ! ब्राह्मणे कशाचे ? त्यांस काय वेद आहे ? त्यांची विद्या व शास्त्रें, ज्ञानें सर्व आमच्याहून कमी आहेत, परंतु ते श्रीमान आहेत म्हणून त्यांचे ब्राह्मणपणाचें प्रकटीकरण होतें, आणि आमचे ब्राह्मणपणाचें प्रकटीकरण होत नाही.' साधारण वैद्यास पुसा की, इंग्रजांचें वैद्यक व शारीर तुमच्यापेक्षा अधिक आहे की काय ? तर मूर्ख वैद्यही म्हणेल की, 'छिः कशाचें वैद्यक व कशाचें शारीर ! आमच्यामध्ये सर्व आहे. किंबहुना जास्ती आहे.' परन्तु हें सांगण्यास त्याने इंग्रजी वैद्यक पहावयास नको. तें पाहिल्याशिवाय व अनुभव घेतल्याशिवायच तो म्हणेल की, छिः त्यांत कांही नाही. हा त्याचा स्वभावच.

ब्राह्मणास आपल्याहून वरिष्ठ कोणीच वाटत नाही व कोणताही ग्रंथ त्याचे हातांत घाल तर ते म्हणतील की, 'दगड आहे पोथ.' नांव देखील वाचून पहावयाचे नाहीत. आणि म्हणतील की, यांत गोष्टी आहेत, अवघ्या त्या गोष्टी. हीं पुस्तकें आपली उगाच छापतात. त्यांत कांही नाही. प्राण गेला तरी त्या पुस्तकांत काय आहे, ते पहाणार नाहीत, व त्याचें एक पानही उघडून पहाणार नाहीत. भट, वैदिक हे सगळे संहिता पाठ करतील, पण वर्तमानपत्राची एक ओळ वाचणार नाहीत.

सर्वच शास्त्री, पंडित यांस तर सर्व तुच्छ वाटतें. आपले ठिकाणी गर्व करून ते बसतात आणि आपल्यास ते व्याकरणी म्हणवितात. परं[illegible] त्यांस साधारण गोष्टीचें देखील ज्ञान नसतें. पुणेशहर येथील मोठे का[illegible] दार व मोठे पंडित यांस आणून पुसा की येथे कलेक्टर किती आहे ? साहेब व मुख्य कोण आहे ? तर त्यांस समजणार नाही. आणि पाहिलें [illegible] साठ हजार कौमुदी पाठ करितात व साधारण निरर्थातील ज्या व्यवहा[illegible]

गोष्टी त्यांविषयी मूर्ख असतात. जर कोणी शहाणे मनुष्याने त्यांचें घोकणें ऐकलें, तर त्यास असें वाटेल की, हा काय वेडा आहे ? किंवा मूर्ख आहे ? किंवा भ्रांतीचद आहे ? असें मूर्ख असोन आपली प्रतिष्ठा लोकांत निरर्थितात आणि लोकांस तर कोणाची प्रतिष्ठा करावी, हें समजत नाही. असें असोन मोठ्या शालजोड्या अंगावर घेऊन आचार्यबुवा, भटजीबुवा म्हणवितात. परंतु हीं सर्व ढोंगें आहेत, हें लोक जाणत नाहीत आणि त्यांचे नादीं लागून त्यांस पैसा देतात. परंतु स्वतः विचार पहात नाहीत. बरें वाईट दुसऱ्यानें दाखविलें तरी पहात नाहीत. त्यास मूर्ख म्हणून त्याची फजिति करितात.

अलीकडे नवे ग्रंथ बहुत झाले आहेत. रसायनशास्त्र, यंत्रज्ञान, शिल्प इत्यादिक. परंतु त्यांतील गोष्ट कोणी एकही पहात नाही व लोकांचे स्वभाव असे विलक्षण आहेत की, पुढारी होईल त्यांस पाडाव करितात. त्यांचें रक्षण कोणी करीत नाही. त्यांचा एकजपणा मुळींच नाही. जर त्यांस लग्नास, मुंजीस, वगैरे बोलाविलें तर पांच हजार लोक येऊन चार घटिका उगेच बसतात; परंतु अमुक विचार करावयाचा आहे तेथे या म्हणून बोलाविलें तर येणार नाहीत; व आले तरी त्यांस बोलतां येणार नाही. त्याच्याने विचार करवत नाही. त्यांचीं चित्तें विचाराकडे नाहीत. मागील चाल पडली आहे, म्हणून त्यास वगैरे तरी जमतात. परंतु चालीविरुद्ध अमुक एक वळें नीट करावयाचें आहे, त्यास पक्की करण्यास बोलाविलें, तर कदापि येत नाहीत.

बरें, हें पैसा देण्याचें काम आहे, म्हणून असो परंतु लोक दारू पितात, त्यांचा बंदोबस्त कोणत्या रीतीने करावा, याजकरिता फुकट बोलाविलें तरीही बहुतकरून जमणार नाहींत व शास्त्री, पंडित त्यांत असले तर एकही गोष्ट सिद्धीस जावयाची नाही. कोणी कुतर्क करील. दुसरा पंडित बोलला, म्हणजे त्यास उगेच उत्तर करावें, म्हणजे श्रेष्ठत्व झालें, भलतेंच बोलतात. या प्रकारची यांची व्यवस्था

आहे. मग मोठाले विचार करणार कोठून ? यांस माहितगारी नाही, बरें, जें दुसरें सांगतात तें तरी ऐकावें; तेंही करीत नाहीत ग्रहण चंद्राचे छायेनें पडतें, हें कदापि खरें मानीत नाहीत. व त्याचा पुरावा पहात नाहीत पुराणातील वेड मनात भरलेलें असतें, तें जातच नाही. या प्रकारचे लोक मूर्ख आहेत, आणि सरकारास अगदी मदत करीत नाहीत आज सरकारास मदत करणारे लोक पारशी मात्र आहेत त्यामध्ये मात्र काही सुधारणा झाल्या आहेत.

धर्माचे सनुंमे स्वमापंत करावे, त्यास पैसा द्यावा, गरीबाकरिता धर्मशाळा कराव्या व गरीबांकरिता औषधपाणी देण्याकरिता वैद्यखाने. दवाखाने करावे, हीं धर्मकृत्यें आहेत, असें ते जाणतात व सरकाराने कोंही एक कामात पैसा दिला, तर आपण बाकीचा देऊन सरकारचा मनोदय पुरता करितात. व लग्नकार्यास पैसा उडवीत नाहीत त्याचे घरीं लग्न होईल, तो पन्नास रुपये धर्म करावयाचा, तो करलान्यास देतो जर ब्राम्हणामध्ये ही गोष्ट कोणी पुढे काढील आणि लग्न प्रयोजनांतील दक्षिणा बंद करील, तर ब्राम्हणांचें मोठें शत्रुत्व होईल त्यांस असाच पैसा उडवावा, गरीब, आंधळे यांनी औषधाशिवाय, घराशिवाय मरावें, हेंच बर वाटतें व उद्दट, दांडगे, आगांतुक यांस पैसा मिळाला, म्हणजे मोठें कार्य झालें असें वाटतें वास्तव असे पारशी लोक आपले जातींत व्यापार वृध्दीचें व विद्यावृध्दीचें उदाहरण दाखवीत आहेत, तसें ब्राम्हणांनी करून सरकारास मदत करावी म्हणजे सरकार सर्व बेत सिद्धीस नेईल तें न करून रडत बसतात आणि सरकारास नाव ठेवितात हे मूर्ख आहेत की नाही, याचा हें पत्र वाचणारे योंनी विचार करावा

मि.